**भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना सन २०१८-१९ मध्ये राबविताना अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी रू.३६० लक्ष निधी अर्थसंकल्पिय वितरणप्रणालीवर उपलब्ध करून देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्र. फुंफला-२०१८/प्र.क्र.२३६/९-अे,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १४ फेब्रुवारी, २०१९

संदर्भ:-

१. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. राफयो-२०१८/प्र.क्र. ४७/९अे, दि. ०६/०७/२०१८
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. ०२/०४/२०१८
३. कृषि विभाग अर्थसंकल्प कक्ष पत्र क्र.पूरक-२०१८/प्र.क्र.१०९/१८/२अे, दि.०६/१२/२०१८
४. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. राफयो-२०१८/प्र.क्र.४७(भाग-४)/९अे, दि.२८/१२/२०१८
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. २५/०१/२०१९
६. आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र. बीयुडी-२०१८/प्र.क्र.११/कार्यासन ६, दि.११/०२/२०१९

**प्रस्तावना :-**

महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेंतर्गत जे शेतकरी फळबाग लागवडीकरिता पात्र ठरु शकत नाहीत अशा शेतकऱ्यांसाठी राज्य शासनाने भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना सुरू केली आहे. सदर योजना सन २०१८-१९ मध्ये राबविण्यास संदर्भाधीन क्र.१ येथील दिनांक ०६/०७/२०१८ च्या शासननिर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेची चालू वर्षी अंमलबजावणी करण्याकरिता रू.४५०.०० लाख इतका निधी पूरक मागणीद्वारे नोव्हेंबर, २०१८ च्या विधानमंडळ अधिवेशनात अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.त्यानुषंगाने सदर योजनेकरिता वित्त विभागाच्या दि.२५/०१/२०१९ च्या परिपत्रकानुसार ८० टक्क्याच्या मर्यादेत रू.३६०.०० लक्ष निधी आदिवासी विकास विभागाने या विभागास उपलब्ध करून दिला आहे. सदर निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर आयुक्त (कृषि) यांना उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

१. सन २०१८-१९ मध्ये भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजनेच्या अंमलबजावणीकरिता अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी रू.३६०.०० लक्ष (रू.तीन कोटी साठ लक्ष फक्त) निधी आयुक्त कृषि यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध करून देण्यात येत आहे.
२. सदर निधी खालील लेखाशीर्षांतर्गत चालू वर्षी अर्थसंकल्पित केलेल्या तरतूदीतून खर्ची टाकावा.

मागणी क्र. टी-५
२४०१- पिक संवर्धन
७९६, अनुसूचित जनजाती क्षेत्र उपयोजना,
(०१)(३६)
भाऊसाहेब फुंडकर फळबाग लागवड योजना
(२४०१ A८९८) ३३ अर्थसहाय्य

३. या शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात आलेल्या रुपये ३६०.०० लक्ष रक्कमेचे कोषागारातून आहरण व वितरण करण्याकरिता सहायक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, आयुक्त (कृषि) यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर योजनेअंतर्गत अनुदान लाभार्थ्यांना त्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर थेट लाभ हस्तांतरण (डीबीटी) द्वारे अदा करण्यात यावे.

५. या शासन निर्णयाद्वारे उपलब्ध करुन दिलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने आयुक्त (कृषि) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

६. अनुसूचित जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत उपलब्ध करून देण्यात आलेल्या तरतुदींतून फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांनाच लाभ देण्यात येईल याची दक्षता घ्यावी. संदर्भाधीन क्र.६ येथील आदिवासी विकास विभागाच्या शासन निर्णयात नमूद अटी व शर्ती विचारात घेऊन कार्यवाही करावी. तसेच सदर योजनेंतर्गत लाभ देण्यात आलेल्या अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांची यादी आदिवासी विकास विभागास उपलब्ध करून द्यावी.

७. निधी खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तीकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित अटी व शर्तीचे व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

८. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ व दि.२५/०१/२०१९ मधील अटी व शर्तीचे अनुपालन करण्याच्या अधीन राहून प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.३२६/२०१८/व्यय १, दिनांक ०५/०१/२०१९ अन्वये तसेच आदिवासी विकास विभागाने त्यांच्या अनौ.सं.२९/६दि.१२/०२/२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२१४१५०९४५९००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Ashok Maroti Atram
Date: 2019.02.14 15:14:13 +05'30'

**(अशोक आत्राम)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई -३२
२. मा. मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
३. मा. विरोधी पक्ष नेता,महाराष्ट्र विधान परिषद, महाराष्ट्र राज्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान सभा, महाराष्ट्र राज्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मा.राज्यमंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
६. सचिव, (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
७. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई

१०. आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.
११. आयुक्त आदिवासी विकास महाराष्ट्र राज्य, नाशिक
१२. सर्व संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. सर्व विभागीय कृषि सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
१४. सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, महाराष्ट्र राज्य.
१५. सहाय्यक संचालक (लेखा) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
१७. वित्त विभाग,(व्यय-१) मंत्रालय, मुंबई-३२
१८. कार्यासन ६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. संचालक लेखा व कोषागार अधिकारी, मुंबई (२ प्रती)
२०. सहसंचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -३२
२१. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२२. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
२३. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
२४. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
२५. निवड नस्ती/९-अे.